संगणक सांकेतांक २००७०७१३१८०४२२००१

**महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका परिच्छेद 202 नुसार प्रचलित असलेला निविदा सूचनांचा कालावधी कमी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक सीएटी 10/2006/प्र.क्र.133/इमारती-2**
**मंत्रालय, मुंबई - 400 032.**
**दिनांक - 02 नोव्हेंबर 2006.**

**वाचा** - 1) शासन निर्णय सा.बां.वि.क्र. सीएटी 1087/सीआर 82/इमारती-2 दिनांक 5 सप्टेंबर 1988.
2) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्रमांक सीएटी 1097/ सीआर 166/इमारती-2, दिनांक 15/4/1997.

-------------

**प्रस्तावना** :- सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका परिच्छेद 202 नुसार व शासन निर्णय क्र. सीएटी 1087/सीआर 82/इमारती-2, दिनांक 5 सप्टेंबर 1988 अन्वये प्रचलित असलेल्या नियमानुसार निविदा सूचना प्रसिध्द करुन, प्रत्यक्ष निविदा प्राप्त होण्यास दीर्घ कालावधी लागतो. त्यामुळे कामे पूर्ण होण्यास विलंब होतो. प्रचलित नियम हे सुमारे 18-20 वर्षापूर्वी तयार करण्यात आलेले आहेत. त्यावेळेस दळणवळणाची व संपर्कांची माध्यमे प्रगत नव्हती व निविदा सूचना सर्वत्र पोहोचण्यास दीर्घ कालावधी लागत होता.परंतु आता. ई-गव्हर्ननन्स, नेटवर्क, इंटरनेट व संगणकाच्या युगामध्ये संपर्क व दळणवळण झपाटयाने सुधारले असून, यासाठी अल्प कालावधी लागतो. तसेच आता निविदा सूचना या सा.बां.विभागाच्या वेबसाईटवर तसेच मोबाईलवरसुध्दा उपलब्ध होतात व कंत्राटदारही त्यादृष्टीने जास्त जागरुक व सक्षम झाले आहेत. याचा सर्वकष विचार करता, निविदा सूचनांचा कालावधी कालानुरूप कमी करणे गरजेचे तसेच उचित आहे. त्यामुळे हा कालावधी कमी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याला अनुसरुन खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय** :- वरील प्रस्तावनेत नमूद केलेल्या परिस्थितिचा विचार करुन, निविदा सूचनांचा कालावधी खाली दर्शविल्याप्रमाणे कमी करण्यात येत आहे :-

| **कामांचा प्रकार** | | **कालावधी** | |
|---|---|---|---|
| | | **प्रथम सूचना** | **व्दितीय सूचना** |
| 1 | 5 लाखापेक्षा कमी किंमतीची कामे | 08 दिवस | 05 दिवस |
| 2 | 5 ते 50 लाख किंमतीची कामे | 15 दिवस | 08 दिवस |
| 3 | 50 लाखापेक्षा जास्त किंमतीची कामे | 25 दिवस | 15 दिवस |

शासन निर्णय क्र. सीएटी 1087/सीआर 82/इमारती-2, दिनांक 5 सप्टेंबर 1988 व शासन परिपत्रक क्रमांक सीएटी 1097/सीआर 166/इमारती-2, दिनांक 15/4/1997 तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम पुस्तिका परिच्छेद 202 मध्ये दर्शविलेल्या



(कृ.मा.प.

निविदा सूचनांबाबतच्या इतर तरतुदी तशाच कायम राहतील. निविदा सूचनांचा हा सुधारित कालावधी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होईल.

या शासन निर्णयाला अनुलक्षून महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका परिच्छेद 202 मध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक 293/06/व्यय-11, दिनांक 31/10/2006 अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अ.मु. सोलेगांवकर

(अ. मु. सोलेगांवकर)
आंतर वित्तीय सल्लागार
व
उपसचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र (1), (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र (2), (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
मुख्य अभियंता, एम.एम.आर.डी.ए., मुंबई,
संचालक, सिडको, निर्मल बिल्डींग, नरीमन पॉईंट, मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
कार्यासन अधिकारी, कार्यासन लेखापरीक्षा, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.
(महाराष्ट्र सा.बां.नियम पुस्तिका परिच्छेद-202 च्या दुरुस्तीसाठी)
अधीक्षक अभियंता, पोलीस कल्याण व गृहनिर्माण महामंडळ, मुंबई,
सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग,
संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
कार्यकारी अभियंता, सर्व जिल्हा परिषदा,
सर्व अधिकारी/कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व अधिकारी/कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
मुख्य अभियंता, म्हाडा, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई,
आयुक्त, दुग्धविकास, वरळी, मुंबई,
अधीक्षक अभियंता, दुग्धविकास, वरळी, मुंबई,
कार्यासन इमारती-2,सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती)

-------